**विशेष पोलीस महानिरीक्षक (कारागृह), दक्षिण विभाग, मुंबई यांच्याकरीता जुने शासकीय वाहन निर्लेखित करून नवीन शासकीय वाहन खरेदीस व येणाऱ्या खर्चास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः जेएलएम-१३१४/प्र.क्र.२२७/तुरुंग-२**
जागतिक व्यापार केंद्र, सेंटर नं. १, ३० वा मजला,
कफ परेड, मुंबई-४०० ००५
दिनांक: ४ फेब्रुवारी, २०१५

**वाचा**

१) अपर पोलीस महासंचालक व कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र. इप्र/काउमनिदवि/वाहनखरेदी/१२३३९/२०१४/कक्ष-६(२), दिनांक ५.१२.२०१४.
२) शासन निर्णय वित्त विभाग क्र.वाहन २०१४/प्र.क्र.९/१४/विनियम, दिनांक ८.५.२०१४
३) शासन निर्णय वित्त विभाग क्र.वाहन २०१४/प्र.क्र.९/१४/विनियम, दिनांक ४.८.२०१४
४) शासन निर्णय गृह विभाग क्रमांकः जेएलएम-१३१२/प्र.क्र.८७/तुरुंग-२, दिनांक १५.२.२०१४

**प्रस्तावना :-**

अपर पोलीस महासंचालनालय व कारागृह महानिरीक्षणालय, पुणे आणि राज्यातील कारागृहांकडे एकूण ८६ शासकीय वाहनांची आवश्यकता लक्षात घेऊन राज्यस्तरीय वाहन आढावा समितीच्या मान्यतेने वाहने अनुज्ञेय करण्यास वरील दिनांक १५.२.२०१४ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली असून, सदर वाहनांमध्ये विशेष पोलीस महानिरीक्षक (कारागृह), दक्षिण विभाग, मुंबई या कार्यालयाकडील शासकीय वाहन क्रमांक एमएच -०१, एसए-१९२ इस्टीम मारूती या वाहनाचा समावेश असून सदर वाहन निर्लेखित करण्यात आलेले आहे. सबब, विशेष पोलीस महानिरीक्षक (कारागृह), दक्षिण विभाग, मुंबई यांच्याकरीता जुने शासकीय वाहनाच्या बदल्यात वरील वाचा क्र.२ येथील शासन निर्णयाच्या अधीन नवीन शासकीय वाहन खरेदीस मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय**

शासन आता, विशेष पोलीस महानिरीक्षक (कारागृह), दक्षिण विभाग, मुंबई यांचेकरिता वाचा क्र. २ व ३ येथील शासन निर्णयानुसार रु.८ लक्ष किंमत मर्यादेतील होंडा मोबिलो एस एमटी पेट्रोल नॉन मेटॅलिक टी व्हाईट हे रू. ७,९०,०२७/-(रुपये सात लक्ष नव्वद हजार सत्तावीस फक्त ) किमतीचे त्याच प्रकारचे वाहन खरेदीस मान्यता देत आहे.

२. याबाबतचा खर्च मागणी मागणी क्र. बी-५, २०५६-तुरुंग (योजनेतर), ००१, संचालन व प्रशासन, (००)(०१) कारागृह निरीक्षणालय (दत्तमत) (२०५६ ००२६), ५१, मोटर वाहने या उपशीर्षातंर्गत सन २०१४-१५ साठी उपलब्ध असलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

३. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने अनौपचारीक संदर्भ क्र.२७/१५/ विनियम, दिनांक १३.१.२०१५ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०१०३१६२७२५२२२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Jaysing L Pawara

Digitally signed by Jaysing L Pawara
DN: CN = Jaysing L Pawara, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Deputy Secretary
Date: 2015.02.04 17:19:17 +05'30'

**( ज. ल. पावरा)**
शासनाचे उप सचिव.

प्रत,

- अपर पोलीस महासंचालक व कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे,
- महालेखापाल, महाराष्ट्र (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य १ मुंबई,
- महालेखापाल, महाराष्ट्र (लेखा परिक्षा), महाराष्ट्र राज्य १ मुंबई,
- विशेष पोलीस महानिरीक्षक (कारागृह), दक्षिण विभाग, मुंबई-८.
- जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे,
- अवर सचिव ,वित्त विभाग (विनियम), मंत्रालय,मुंबई-३२,
- उप सचिव (बीयुडी-१), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई -३२,
- निवड नस्ती (तुरुंग-२).